वितरण आदेश क्र.५

राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत मंजूर तरतूदीमधून ६ विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांकरिता व राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा पुणे या कक्षामार्फत जिल्हा संस्थांना प्रशासकीय प्रशिक्षणाकरिता (प्रशिक्षण शुल्क) निधी वितरित करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत. (सन २०१५-१६ योजनांतर्गत) लेखाशिर्ष ( २०७० ०८५३) -३१ सहायक अनुदाने

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः यशदा २०१५/प्र. क्र. ९४ /१५/१२ अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १० ऑगस्ट, २०१५.

**वाचा :** १. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. - टीआरएन-२००९/ प्र.क्र.३९ /२००९/१२-अ, दि.२३ सप्टेंबर,२०११.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. - टीआरएन -२०११/ प्र.क्र.२८७ /२०११/१२-अ, दि.१४ ऑक्टोबर,२०१३.
३. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. - टीआरएन -२०१४/ प्र.क्र.१२० /२०१४/१२-अ, दि.१४ ऑगस्ट,२०१४ व दि.१२ सप्टेंबर,२०१४
४. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. - टीआरएन -२०१४/ प्र.क्र.६६ /२०१४/१२-अ, दि.१ नोव्हेंबर,२०१४.
५. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - बीयुडी-२०१५/ प्र.क्र.७९ /२०१५/२५, दि.८ एप्रिल, २०१५
६. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं/२०१५ प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३ दि.१७ एप्रिल,२०१५.
७. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - बीयुडी-२०१५/ प्र.क्र.७९ /२०१५/२५, दि.१८ जून, २०१५

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्याचे प्रशिक्षण धोरण मंत्रीमंडळाच्या मान्यतेने दि.२३.९.२०११ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आले आहे. सदर धोरणान्वये संपूर्ण राज्यामध्ये वर्ग १ ते वर्ग ४ च्या अधिकारी कर्मचारी यांचे पायाभूत प्रशिक्षण, पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण, उजळणी प्रशिक्षण, बदलीनंतरचे प्रशिक्षण व नवीन विषयाची तोंडओळख या प्रकारचे प्रशासकीय प्रशिक्षण घेण्याचे निश्चित झाले आहे. या प्रशासकीय प्रशिक्षणाकरिता संवर्गनिहाय प्रशिक्षण घेण्याकरिता, या कार्यासनाच्या संदर्भाधीन क्र.२ व ३ च्या शासन निर्णयान्वये विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था व जिल्हा स्तरीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था घोषित करण्यात आल्या आहेत.

२. राज्य शासनाचे प्रशिक्षण धोरण प्रभावीपणे राबविण्याकरिता जिल्हा स्तरीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांमध्ये वर्ग ४ च्या कर्मचा-यांकरिता प्रशिक्षण घेण्याचे निश्चित झाले आहे. तथापि, जिल्हा स्तरीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था घोषित होऊन जवळजवळ १० महिन्याचा कालावधी उलटून गेला असून, या संस्थांमध्ये अद्यापही प्रशिक्षण घेण्याची सुरुवात झालेली दिसून येत नाही. त्यामुळे आता सर्व विभागीय व जिल्हा स्तरीय संस्थामध्ये या धोरणाच्या अंमलबजावणी करिता मंत्रालयीन विभागातील तसेच, त्यांच्या

अधिनस्त क्षेत्रीय कार्यालयातील, त्याचप्रमाणे विभागीय व जिल्हा पातळीवरील वर्ग-२ ते वर्ग-४ या संवर्गातील अधिकारी / कर्मचारी यांचे प्रशासकीय प्रशिक्षण सन २०१५-१६ या आर्थिक वर्षामध्ये प्रत्येक विभागीय संस्थेमध्ये प्रत्येकी १००० प्रशिक्षणार्थी व प्रत्येक जिल्हा प्रशिक्षण संस्थेत प्रत्येकी ७०० प्रशिक्षणार्थी या प्रमाणे घेण्याचे निश्चित करण्यात आले आहे. या प्रशिक्षणार्थ्यांकरिता निवास व भोजन व्यवस्था तसेच, प्रशिक्षणात अंतर्भूत सर्व बाबींसाठी संदर्भाधीन क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये विभागस्तर व जिल्हास्तर निहाय प्रशिक्षण संस्थांसाठी प्रशिक्षण शुल्क मंजूर करण्यात आले आहे. त्यानुसार या प्रशासकीय प्रशिक्षणाच्या खर्चाकरिता सर्व विभागीय व जिल्हा प्रशिक्षण संस्थांना निधी वितरित करण्याकरिताच्या प्रस्तावास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

सदर धोरणाच्या अंमलबजावणीसाठी मागणी क्र. ए-०४, २०७०-इतर प्रशासकीय सेवा ००-००३-प्रशिक्षण ००-१०- राज्य प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी विविध सुविधा व सहाय्य यावरील खर्च (२०७० ०८५३) ३१-सहायक अनुदान, योजनांतर्गत या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरिता संदर्भाधीन क्र. ५ च्या शासन परिपत्रकान्वये एकूण रु.१४७३.५० लाख (अक्षरी चौदा कोटी, त्र्याहत्तर लाख, पन्नास हजार फक्त ) इतकी तरतूद अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये करण्यात आली. संदर्भाधीन क्र. ६ च्या वित्त विभागाच्या दि.१७.४.२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार योजनांतर्गतसाठी प्रथम **आठमाहीकरिता ( नोव्हेंबर २०१५ पर्यंत )** अर्थसंकल्पीय तरतूदीच्या ७० % निधी खर्च करण्याची मर्यादा विहित करण्यात आली आहे. त्यानुसार **अर्थसंकल्पीय तरतूदीच्या** एकूण रु.१४७३.५० लाखाच्या **७० % च्या मर्यादेत रु.१०,३१,४५,०००/-** इतके सहायक अनुदान अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आले आहे. संदर्भाधीन क्र. ५ च्या परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीनुसार संदर्भाधीन क्र. ७ च्या शासन परिपत्रकान्वये सदर योजनांतर्गत संपूर्ण अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यात आले आहे.

२. राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणे अंतर्गत आता सदर अनुदानाच्या मर्यादेत खाली दर्शविल्यानुसार, ६ विभागीय संस्था व ३६ जिल्हास्तरीय संस्थांमध्ये घेण्यात येणा-या प्रशासकीय प्रशिक्षणाकरिता, प्रशिक्षण शुल्काच्या खर्चापोटी खाली दिलेल्या तक्त्यानुसार **रु.१२,०६,००,०००/- ( रुपये बारा कोटी, सहा लाख फक्त )** इतक्या खर्चास वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-तीन, अ.क्र. ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या शक्तींचा वापर करुन व सदर अधिकारातील रकाना क्र.६ खालील अटींच्या आधारे राहून **प्रशासकिय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.**

| विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांसाठी आवश्यक रक्कम खालीलप्रमाणे आहे:- | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था | निश्चित करण्यात आलेले प्रति प्रशिक्षणार्थी प्रति दिवसाचे प्रशिक्षण शुल्क | प्रशिक्षीत करण्यात येणाऱ्या प्रशिक्षणार्थींची संख्या | प्रशिक्षणाचे एकूण दिवस | प्रशिक्षणासाठी एकूण खर्च |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | ६ | १५०० | १००० | ५ | ५*६*१५००*१००० = ४,५०,००,००० |
| | | | | एकूण | रू.४,५०,००,००० |
| जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांसाठी आवश्यक रक्कम खालीलप्रमाणे आहे :- | | | | | |
| अ.क्र. | जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था | निश्चित करण्यात आलेले प्रति प्रशिक्षणार्थी प्रति दिवसाचे प्रशिक्षण शुल्क | प्रशिक्षीत करण्यात येणाऱ्या प्रशिक्षणार्थींची संख्या | प्रशिक्षणाचे एकूण दिवस | प्रशिक्षणासाठी एकूण खर्च |
| १ | ३६ | १००० | ७०० | ३ | ३६*१०००*७००*३ = ७,५६,००,००० |
| | | | | एकूण | रू.०७,५६,००,००० |
| | | | | एकूण | रू.१२,०६,००,००० |

३. सदर मान्यतेच्या अधीन राहून ६ विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था व ३६ जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था यांनी वर्षभरात वरील तक्त्यातील रकाना क्र.४ मध्ये नमूद संख्ये इतक्या प्रशिक्षणार्थ्यांना प्रशिक्षण देणे अनिवार्य आहे. त्यानुसार आता सहा विभागीय संस्था व ३६ जिल्हास्तरीय संस्थामध्ये घेण्यात येणाऱ्या प्रशासकीय प्रशिक्षणाकरिता प्रशिक्षण शुल्काच्या खर्चापोटी राज्यातील सहा विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांना खाली नमूद केलेल्या तक्त्यातील रकाना क्र. ४ नुसार **एकूण रु.९४.०० लाख,** ( अक्षरी चौऱ्याण्णव लाख फक्त ) इतके सहायक अनुदान वितरीत करण्यात येत आहे.

४. तसेच, राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा पुणे, यांच्या मार्फत आता सदर अनुदानाच्या मर्यादेत प्रत्येक जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थेला रु.५.०० लाख (अक्षरी पाच लाख फक्त) याप्रमाणे एकूण ३० जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांसाठी एकूण **रु.१५०.००** लाख (अक्षरी एकशे पन्नास लाख फक्त) इतके सहायक अनुदान वितरीत करण्यात येत आहे.

*** विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांना करावयाचे निधी वितरण :-**

| अ.क्र. | विभागीय संस्थांची नांवे | सन २०१५-१६ करिता प्रशासकीय प्रशिक्षण शुल्काकरिता मंजूर अनुदान | त्यापैकी एप्रिल २०१५ ते सप्टेंबर, २०१५ या सहा महिन्यांकरिता वितरीत करण्यात येणाऱ्या अनुदानाची रक्कम | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | मराठवाडा प्रबोधिनी, औरंगाबाद | रु.७५,००,०००/- | **रु.२५,००,००० /-** | सदर संस्थांनी प्रशासकीय प्रशिक्षण घेण्यात आलेल्या |
| २ | विदर्भ प्रबोधिनी, अमरावती | रु.७५,००,०००/- | **रु.२५,००,००० /-** | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३ | रामेती, पुणे | रु.७५,००,०००/- | **रु.११,००,००० /-** | प्रशिक्षणार्थ्यांची संख्या शासनास कळविल्यानंतर त्यांना मंजूर करण्यात आलेल्या रकाना क्र.३ मधील अनुदानातून रकाना क्र.४ चे अनुदान वजा करुन उर्वरित अनुदान वितरित करण्यात येईल. |
| ४ | रामेती- खोपोली ,रायगड | रु.७५,००,०००/- | **रु.११,००,००० /-** | |
| ५ | नाशिक महसूल प्रबोधिनी, नाशिक | रु.७५,००,०००/- | **रु.११,००,००० /-** | |
| ६ | वनामती, नागपूर | रु.७५,००,०००/- | **रु.११,००,००० /-** | |
| | **एकूण** | **रु.४,५०,००,०००/-** | रु.९४,००,००० /- | |

**<u>* जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांना करावयाचे निधी वितरण :-</u>**

रु

१) प्रत्येक जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थेला सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरिता **<u>रु.२१.०० लाख (अक्षरी एकवीस लाख फक्त)</u>** याप्रमाणे एकूण **<u>३६ जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांसाठी एकूण रु.७५६.०० लाख (अक्षरी सातशे छप्पन्न लाख फक्त)</u>** इतके सहायक अनुदान मंजूर करण्यात येत आहे.

२) तथापि, ( नाशिक, अहमदनगर, औरंगाबाद, रायगड, गोंदिया व अमरावती. ) या ६ जिल्हयातील, जिल्हा प्रशिक्षण संस्थांना सद्य:स्थितीत तांत्रिक अडचणीमुळे वगळण्यात येत असून, उर्वरित **<u>३० जिल्हा प्रशिक्षण संस्थांकरिता (विवरणपत्र-अ प्रमाणे</u>**) प्रत्येकी **<u>रु.५.०० लाख (पाच लाख फक्त)</u>** याप्रमाणे **<u>एकूण रु.१५०.०० लाख</u> (अक्षरी एकशे पन्नास लाख फक्त)** इतके सहायक अनुदान या वितरण आदेशान्वये मंजूर करण्यात येत आहे.

३) सदर, प्रशिक्षण संस्थांनी प्रत्यक्ष प्रशिक्षण दिल्यानंतर प्रशिक्षणार्थ्यांच्या संख्येच्या मर्यादेत उर्वरित अनुदान संस्थेस वितरित करण्यात येईल.

५. यासाठी होणारा **( रु.९४.०० लाख + रु.१५०.०० लाख ) एकूण रु. २४४.०० लाख ( अक्षरी रुपये दोन कोटी, चव्वेचाळीस लाख फक्त ) इतका खर्च " मागणी क्र .अे-४-२०७० इतर प्रशासकीय सेवा ०० - ००३ -प्रशिक्षण ००- १०- राज्य प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी विविध सुविधा व सहाय यावरील खर्च (२०७० ०८५३ ) ३१ सहायक अनुदान"** योजनांतर्गत या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातून करण्यात येत आहे.

६. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान सर्व विभागीय संस्थांनी व यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेने तात्काळ कोषागारातून आहरित करावे. त्यानंतर संचालक (STPEA) यशदा, पुणे यांनी १५ दिवसाच्या आत ३० जिल्हा संस्थांना सदर अनुदान वितरित करावे. सदर अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी.

७. संस्थांनी आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर व शासनाला सदर विनियोग प्रमाणपत्रात बाबनिहाय तपशीलवार खर्चाची नोंद घेऊन तातडीने सादर करावे.

८. उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

९. संस्थेने आर्थिक वर्ष २०१५-२०१६ मधील खर्च मंजूर अनुदानाइतका सिमित ठेवावा.

१०. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं/२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची तसेच या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची पूर्तता होत आहे.

११. सदर शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या मान्यतेने अनुक्रमे संदर्भ क्र.१३१/१४४३, दि.२९.५.२०१५ व संदर्भ क्र.५२१/१५/व्यय ४, दि.२५.६.२०१५ व अर्थसंकल्प -१४ यांच्या दि.७.७.२०१५ च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०८१०१५१८३१३४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Haridas Bhogle

Digitally signed by Santosh Haridas Bhogle
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Santosh Haridas Bhogle
Date: 2015.08.10 15:23:54 +05'30'

**( डॉ.संतोष भोगले )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
३. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
४. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
६. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
७. विभागीय आयुक्त (सर्व विभाग)
८. जिल्हाधिकारी (सर्व जिल्हे)
९. उपमहासंचालक, राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,

१०. संचालक, राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,

११. संचालक, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर), पैठण, जिल्हा- औरंगाबाद.

१२. संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नवीन प्रशासकीय इमारत, तपोवन रोड,अमरावती विद्यापीठासमोर, जिल्हा - अमरावती.

१३. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन संस्था,वनामती, नागपूर

१४. संचालक, प्रादेशिक कृषी विस्तार व्यवस्थापन संस्था,रामेती, पुणे

१५. संचालक, प्रदेशिक कृषी विस्तार व्यवस्थापन संस्था,रामेती, खोपोली, शिळफाटा, ता.खालापूर, जिल्हा- रायगड

१६. संचालक, नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक.

१७. सर्व संचालक / प्राचार्य/ वि.का.अ. जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था.

१८. नियोजन विभाग, ( कार्यासन १४४३ ) / वित्त विभाग (व्यय-४/अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई-३२,

१९. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/का.क्र.२५,

२०. निवड नस्ती/कार्या.१२-अ

**शासन निर्णय क्रमांकः क्र. यशदा २०१५/प्र. क्र. ९४ /१५/१२ अ, दिनांक : १० ऑगष्ट २०१५.**

## विवरणपत्र-अ

| अ.क्र. | विभागीय संस्थांची नांवे | सन २०१५-१६ करिता प्रशासकीय प्रशिक्षण शुल्काकरिता मंजूर अनुदान | त्यापैकी एप्रिल २०१५ ते सप्टेंबर, २०१५ या सहा महिन्यांकरिता वितरीत करण्यात येणाऱ्या अनुदानाची रक्कम |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | वाहतूक प्रशिक्षण संस्था,हंसराज लाईन,भायखळा,बृहन मुंबई. | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| २. | न्युझीलंड हॉस्टेल, आरे कॉलनी, ( गोरेगाव) प ,मुंबई उपनगर | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| ३. | वनरक्षक प्रशिक्षण विद्यालय,शहापूर,ठाणे | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| **४.** | **वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन संस्था ( रामेती ),खोपोली , रायगड** | रु.२१,००,०००/- | -------------- |
| **५.** | **महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी,नाशिक** | रु.२१,००,०००/- | -------------- |
| ६. | दादासाहेब चौधरी वनरक्षक प्रशिक्षण संस्था ,पाल,जळगाव | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| ७. | ग्रामसेवक प्रशिक्षण संस्था मांजरी फार्म,पुणे | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| ८. | वानिकी प्रशिक्षण विद्यालय,कुंडल (कुंडल प्रबोधिनी), सांगली | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| ९. | रामेती, गेट नं ४,शहाजी नगर,मध्यवर्ती इमारती जवळ, लाईन बाजार, कोल्हापूर | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| **१०.** | **महाराष्ट्र जल व भूमि व्यवस्थापन संस्था (वाल्मी), औरंगाबाद** | रु.२१,००,०००/- | -------------- |
| ११. | वनरक्षक प्रशिक्षण संस्था,देऊळगावराजा रोड,पी.बी९३ .,जालना | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| १२. | ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, मराठवाडा ॲग्रीकल्चर विद्यापीठ,परभणी | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| **१३.** | **महाराष्ट्र लेखा व वित्त प्रशिक्षण केंद्र,मांगीलाल प्लॉट, कॅम्प रोड,अमरावती** | रु.२१,००,०००/- | -------------- |
| १४. | ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र,बुलढाणा | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| १५. | आरोग्य आणि कुटुंब कल्याण प्रशिक्षण केंद्र, माताकचेरी, श्रध्दानंद पेठ,नागपूर | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| १६. | सेंट्रल फॉरेस्ट रेंजर कॉलेज,मूल रोड, चंद्रपूर०१- | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| १७. | जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था,जव्हार,ठाणे ४०१६०३ | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| १८. | जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था, मिरजोळे, रत्नागिरी-४१५ ६१२ | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |

| | | | |
|---|---|---|---|
| १९. | जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था, तहसील कार्यालयाच्याबाजुला, कुंडल, जिल्हा-सिंधुदूर्ग | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| २०. | जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था, जुने गरुड हायस्कूल इमारत, साक्री रोड, धुळे | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| २१. | जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था, जिल्हा परिषद आवार, गट सदन इमारत, नंदुरबार | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| **२२.** | **जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था,जुने डी.एड. कॉलेज, संगमनेर, जिल्हा -अहमदनगर** | रु.२१,००,०००/- | ------------- |
| २३. | जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था, फलटण, जिल्हा- सातारा | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| २४. | जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था, सोलापूर | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| २५. | जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था,शिवाजी नगर, जिल्हा- हिंगोली-४३१ ५१३ | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| २६. | जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था, मांजरा कॉलनीच्या बाजूला,अंबेजोगाई, जिल्हा- बीड | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| २७. | जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था,श्रीनगर, जिल्हा- नांदेड | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| २८. | जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था,विद्यानगर, तांबरी विभाग, जिल्हा- उस्मानाबाद | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| २९. | जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था,बार्शी रोड, दत्त नगर,मुरूड,लातूर | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| ३०. | जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था, आकाशवाणी केंद्राजवळ, जिल्हा-यवतमाळ | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| ३१. | जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था, संतोषी माता मंदिराजवळ, हनुमान वस्ती, जिल्हा- अकोला | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| ३२. | जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था,लखाळा,रायसोड रोड, जिल्हा -वाशीम | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| ३३. | जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था, वर्धा-४४२ ००१ | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| ३४. | जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था, शास्त्री चौक, भंडारा-४४१९०४ | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| **३५.** | **जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था,गंगाबाई रूग्णालयाजवळ, जुनी पंचायत समिती, नेहरू चौक, गोंदिया** | रु.२१,००,०००/- | ------------- |
| ३६. | जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था, गडचिरोली - ४४१ ४०३ | रु.२१,००,०००/- | रु.५,००,०००/- |
| | **एकूण** | **रु.७,५६,००,०००/-** | **रु.१,५०,००,०००/-** |

Santosh Haridas Bhogle

Digitally signed by Santosh Haridas Bhogle
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Santosh Haridas Bhogle
Date: 2015.08.10 15:24:15 +05'30'

**( डॉ.संतोष भोगले )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**